**बी-हेवी (B-Hy), सी-हेवी (C-Hy) मळी व ऊसाचा रस या तीन स्वतंत्र स्त्रोतांपासून इथेनॉल निर्मिती करुन त्याची आसवनीच्या टाक्यांमध्ये साठवणूक करण्यास तसेच प्रमाणित करुन विक्री करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक:एमपीएल-१११८/प्र.क्र.३४७/राउशु-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, ५ वा मजला (विस्तार), मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- २३ जानेवारी, २०१९.

**संदर्भ :- शासनाचा समक्रमांकीत दि.१ डिसेंबर, २०१८ रोजीचा शासन निर्णय**.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या, ग्राहक, अन्न आणि सार्वजनिक वितरण विभागाच्या दि.१६.७.२०१८ व दि.१७.७.२०१८ रोजीच्या पत्रान्वये बी-हेवी (B-Hy), सी-हेवी (C-Hy) मळी व ऊसाचा रस या तीन स्वतंत्र स्त्रोतांपासून उत्पादीत होणाऱ्या जलरहीत मद्यार्काचे प्रमाण कच्चा माल निहाय स्वतंत्ररित्या निश्चित करण्याच्या दृष्टीने अभ्यास व पडताळणी करण्याकरिता समिती स्थापित करण्यात आली होती. सदर समितीने केलेल्या शिफारशींच्या आधारे ग्राहक, अन्न आणि सार्वजनिक वितरण मंत्रालय, नवी दिल्ली यांनी त्यांचे परिपत्रक क्रमांक ४०/१/२०१८-(BP&E) दिनांक १८.९.२०१८ अन्वये बी- हेवी व सी-हेवी मळीपासून उत्पादित करावयाच्या इथेनॉल निर्मितीसाठी साखर कारखान्यांनी आणि डिस्टीलरीजनी अंमलात आणावयाच्या मार्गदर्शक सुचना निर्गमित केलेल्या आहेत. केंद्र शासनाचे अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या दिनांक १८.९.२०१८ च्या आदेशामधील अटी शर्ती या केंद्र शासनाच्या दि.१८.१२.२०१८ रोजीच्या ज्ञापनान्वये अधिक्रमित करुन नवीन अटी व शर्ती विहित करण्यात आल्या आहेत. राज्यातील आसवन्या व साखर कारखान्यांशी संलग्न असलेल्या आसवनींकडून बी-हेवी (B-Hy), सी-हेवी (C-Hy) मळी व ऊसाच्या रसापासून उत्पादीत होणारा मद्यार्काचा उतारा नेमका किती असावा तसेच उपरोल्लेखित केंद्र शासनाच्या परिपत्रकीय सूचनांच्या आधारे, राज्यातील साखर कारखाने/ आसवन्यामधुन बी-हेवी, सी-हेवी मळीपासून तसेच ऊसाच्या रसापासून इथेनॉल निर्मिती करण्याबाबत राज्य शासनाचे धोरण निश्चित करणे आवश्यक होते. त्यास अनुसरुन बी-हेवी, सी-हेवी मळीपासून तसेच ऊसाच्या रसापासून तयार होणा-या मद्यार्काचा उतारा आणि प्रचलित कायदे व नियम याआधारे विभागाचे व राज्य शासनाचे हित विचारात घेऊन, केंद्र शासनाच्या परिपत्रकीय सुचनांच्या अनुषंगाने राज्य शासनाचे धोरण निश्चित करण्यासाठी संदर्भाधीन दि.१ डिसेंबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीचा अहवाल शासनास दि.१८ डिसेंबर, २०१८ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झाला आहे. समितीच्या अहवालातील शिफारशी आणि अटी व शर्तीस मान्यता देण्याची तसेच यानुषंगाने शासन धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

१. राज्यातील आसवन्या व साखर कारखान्यांशी संलग्न असलेल्या आसवनींकडून ऊसाच्या रसापासून, बी-हेवी अथवा सी-हेवी मळीपासून इथेनॉल निर्मिती करण्याच्या अनुषंगाने आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांच्या अध्यक्षतेखालील समितीने सादर केलेल्या शिफारशी आणि अटी व शर्तींना मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्यातील आसवन्या व साखर कारखान्यांशी संलग्न असलेल्या आसवनींकडील मळीच्या ग्रेडनुसार मळीमधील टी.आर.एस.-TRS (Total Reducing Sugar) चे प्रमाण आणि बी-हेवी (B-Hy), सी-हेवी (C-Hy) मळी व ऊसाच्या रसापासून उत्पादीत होणारा मद्यार्काचा उतारा याबाबतच्या तरतुदी पुढीलप्रमाणे राहतील :-

अ) शासन अधिसुचना क्र. बीपीए १०९१/प्र.क्र.५/राउशु-२, दि.८.९.२०१५ अन्वये मळीच्या ग्रेडनुसार मद्यार्काचा उतारा निश्चित करण्यात आलेला आहे तो खालीलप्रमाणे आहे.

| Grade of Molasses | T.R.S.% (Total Reducing Sugar) | Recovery of Spirit Litre per M.T. of C-Heavy molasses minimum | | |
|---|---|---|---|---|
| | | A.L.(Alcohol Litre) | B.L.(Bulk Litre) | P.L.(Proof Litre) |
| A | ५० & above | २३३ | २४५ | ४०७ |
| B | ४४ to ४९.९ | १९४ | २०३ | ३३८ |
| C | ४० to ४३.९ | १५० | १५६ | २६२ |

आ) उपरोक्त नमुद करण्यात आलेल्या मळीच्या विविध ग्रेडला सी-हेवी मळी संबोधण्यात यावी. सदर मळी बी मास्केटच्या boiling ऐवजी three boiling system मधुन प्राप्त झालेली असते. three boiling system मधून प्राप्त झालेली मळी व त्यामध्ये TRS चे प्रमाण कितीही असले तरी त्या मळीला सी-हेवी मळी समजण्यात यावे. सी-हेवी मळीची ग्रेड पुर्वीप्रमाणेच A, B, C कायम ठेवण्यात येऊन त्यापासून होणा-या मद्यार्काच्या उता-याच्या निकषात बदल करण्याची आवश्यकता नाही.

इ) जी मळी साखर उत्पादन प्रक्रियेत बी मास्केटच्या boiling मधुन येईल किंवा two boiling system ने प्राप्त होईल व ज्यामध्ये टी.आर.एस. चे प्रमाण किमान ५५% राहील, त्या मळीला बी-हेवी मळी असे संबोधण्यात यावे. Two boiling system मधुन प्राप्त होणा-या मळीमधील टि.आर.एस. चे प्रमाण ५५% पेक्षा कमी आल्यास त्या मळीला सी-हेवी मळी समजण्यात यावे.

ई) मळीपासून येणारा मद्यार्काचा उतारा निश्चित करण्यासाठी तत्कालीन आयुक्त, राउशु यांच्या अध्यक्षतेखालील समितीने मळीमधील TRS च्या आधारे मद्यार्काचा उतारा निश्चित करण्यासाठी केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने शासनाने निर्गमित केलेली अधिसुचना दि.८.९.२०१५ मधील मद्यार्क उता-याच्या निकषाचा आधार घेण्यात यावा.

उ) बी-हेवी मळीपासूनचा मद्यार्क उतारा निश्चित करताना बी-हेवी मळीमधील TRS (Total Reducing Sugar) च्या प्रमाणावर आधारीत पुढीलप्रमाणे दोन प्रकार करावेत.

| Grade of B-Heavy Molasses | T.R.S.% (Total Reducing Sugar) | Recovery of Spirit Litre per M.T. of B-Heavy molasses minimum | | |
|---|---|---|---|---|
| | | A.L. (Alcohol Litre) | B.L. (Bulk Litre) | P.L. (Proof Litre) |
| BH-१ | ६० & above | २९४ | ३०८ | ५१४ |
| BH-२ | ५५ to ५९.९९ | २६७ | २८० | ४६७ |

ऊ) ऊसाच्या रसापासून थेट मद्यार्क निर्मितीचा किमान उतारा निश्चित करण्यासाठी साखरेचा किमान उतारा ९.५% इतका गृहीत धरल्यास, किण्वन व उर्ध्वपातन प्रक्रियेची कार्यक्षमता (Fermentation & Distillation efficiency) विचारात घेता ऊसाच्या रसापासून मद्यार्काचा किमान उतारा खालीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

| Raw Material | Recovery of Spirit Litre per M.T. of Sugarcane minimum | | |
|---|---|---|---|
| | A.L. (Alcohol Litre) | B.L. (Bulk Litre) | P.L. (Proof Litre) |
| Sugarcane Juice | ५७ | ६० | १०० |

वरीलप्रमाणे ऊसाच्या रसापासून मद्यार्काचा किमान उतारा निश्चित करण्यात येत आहे. मात्र काही प्रमाणात अपरिहार्य कारणांमुळे किंवा अन्य कारणांमुळे मद्यार्काचे किमान उत्पादन प्राप्त झालेले नाही तर अशा प्रकरणात संबंधित आसवनीने मद्यार्क उत्पादन /उतारा किमान निश्चित केलेल्या परिमाणापेक्षा कमी आल्यास १% पर्यंत संबंधित जिल्हा अधिक्षकांना, १ ते २% पर्यंत आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना व २% पेक्षा जास्त उतारा कमी आल्यास शासनास त्याबाबत सबळ कारणासह लेखी खुलासा वेळोवेळी सादर करणे आवश्यक राहील. प्रकरणपरत्वे संबंधित सक्षम अधिकारी उचित निर्णय घेतील.

३. राज्यातील साखर कारखाने/ आसवनी घटकांकडून बी-हेवी, सी-हेवी मळीपासुन व ऊसाच्या रसापासून इथेनॉल निर्मिती करुन त्याची आसवनीच्या टाक्यांमध्ये साठवणूक करण्यास तसेच प्रमाणित करुन विक्री करण्यासाठी अटी व शर्ती पुढीलप्रमाणे राहतील :-

a) साखर कारखाना जर बी-हेवी मळीचे उत्पादन करणार असतील तर त्याबाबतचा कालबध्द कार्यक्रम किमान दहा दिवस अगोदर लेखी स्वरुपात घटकाचे राज्य उत्पादन शुल्क विभागाचे प्रभारी अधिकारी अथवा अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क कार्यालयास व साखर आयुक्त कार्यालय यांना कळवतील.

b) साखर कारखाना ऊसाच्या रसापासून थेट इथेनॉलचे उत्पादन करणार असेल तर वरीलप्रमाणेच लेखी स्वरुपात सूचना देण्यात याव्यात.

c) आसवनीधारक बी-हेवी मळीपासून अथवा ऊसाच्या रसापासून इथेनॉलचे उत्पादन करणार असल्यास त्याबाबतची पूर्व कल्पना घटकाने किमान १० दिवस अगोदर लेखी स्वरुपात आसवनीच्या राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या प्रभारी अधिकाऱ्याला द्यावी.

d) बी-हेवी मळी व त्यापासून होणारे इथेनॉलचे उत्पादन हे स्वतंत्र टाक्यामध्ये साठविण्यात यावे. तसेच दोन्ही टाक्यांचे गेजींग करुन सक्षम प्राधिकाऱ्याची पूर्व मान्यता घेतलेली असावी. तसेच उक्त मळी इथेनॉलची नोंद स्वतंत्र नोंदवही अथवा टँकनिहाय स्वतंत्रपणे ठेवण्यात यावी.

e) मळी व मद्यार्काबाबतची विवरणपत्रे विविध कार्यालयांना पाठविताना पूर्वीच्या नमुन्याचाच वापर करावा. तथापि, बी-हेवी व सी-हेवी मळीचे व त्यापासून होणाऱ्या इथेनॉलचे उत्पादन, विक्री, साठा इ. स्वतंत्रपणे दर्शविण्यात यावे.

f) आसवनीधारकांनी बी-हेवी मळीपासून इथेनॉलचे उत्पादन सुरु केल्यानंतर त्यांना पुन्हा सी-हेवी मळीपासून अथवा त्याउलट इथेनॉलचे उत्पादन करावयाचे असल्यास त्याबाबतची लेखी नोटीस किमान १० दिवस अगोदर प्रभारी अधिकाऱ्यांकडे देणे आवश्यक राहील.

g) आसवनीधारकांनी ऊसाच्या रसापासून थेट इथेनॉलचे उत्पादन सुरु केल्यानंतर त्यांना पुन्हा बी-हेवी किंवा सी-हेवी मळीपासून अथवा त्याउलट इथेनॉलचे उत्पादन करावयाचे असल्यास त्याबाबतची लेखी नोटीस किमान १० दिवस अगोदर प्रभारी अधिकाऱ्यांकडे देणे आवश्यक राहील.

h) आसवनी एका वेळी फक्त बी-हेवी अथवा ऊसाच्या रसापासून अथवा सी-हेवी मळीपासून इथेनॉलचे उत्पादन करु शकतील.

i) बी-हेवी मळी अथवा ऊसाच्या रसापासून अथवा सी-हेवी मळी यांचा वापर करुन इथेनॉलचे उत्पादन चालू करताना आसवनीने प्रथम सर्व फरमेंटेशन टँक योग्य पध्दतीने स्वच्छ करणे आवश्यक राहील. आसवनीने कोणत्याही प्रकारे बी-हेवी अथवा सी-हेवी अथवा ऊसाचा रस यापासून मद्यार्काची उत्पादन प्रक्रिया एकत्रित होणार नाही अथवा मद्यार्क एकत्रित होणार नाही याची दक्षता घेणे आवश्यक आहे.

j) आसवनीने / साखर कारखान्याने बी-हेवी व सी-हेवी मळी यांचा साठवणूक ही वेगवेगळया टाक्यांमध्ये करणे आवश्यक राहील. तसेच साठवणूकीच्या सर्व टाक्या ह्या स्टील मध्ये असणे आवश्यक राहील.

k) आसवनीने / साखर कारखान्यांनी मळी साठविण्याबाबत, पाईपलाईन वरील रंगपध्दतीबाबत, वजन करण्याबाबत (स्वतंत्र फ्लो मिटर बसविणे), प्रक्रिया करण्याबाबत तसेच उत्पादीत होणाऱ्या इथेनॉलच्या साठवणूकीबाबत व वाहतूकीबाबत केंद्र शासनाच्या दि. १८/१२/२०१८ च्या पत्रान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांचे तंतोतंत पालन करणे आवश्यक राहील.

l) आसवनीने / साखर कारखान्यांना मळी / मद्यार्काबाबत दैनंदिन माहिती विहीत व मंजूर असलेल्या नमुन्यांमध्ये ठेवणे आवश्यक राहील.

m) बी-हेवी मळीचे उत्पादन करीत असताना भारतीय बनावटीचे विदेशी मद्य व देशी मद्याच्या उत्पादनासाठी मळी उपलब्ध राहील याचे नियोजन करणे आवश्यक आहे. त्याव्यतिरिक्त उपलब्ध असलेली अन्य मळी इथेनॉल ब्लेंडिंग कार्यक्रमांतर्गत राखीव ठेवता येईल.

n) साखर कारखान्यांशी संलग्न आसवण्यासोबतच स्टँड अलोन आसवन्यांना सुध्दा बी-हेवी मळीपासून इथेनॉच्या उत्पादनाची परवानगी देता येईल.

o) बी-हेवी मळीपासून इथेनॉलची परवानगी ही महाराष्ट्र दारुबंदी अधिनियम १९४९ व त्याखालील नियमांतर्गत अनुज्ञप्ती धारण करणाऱ्या आसवन्यांनाच देण्यात येईल.

p) बी-हेवी मळीपासून इथेनॉल उत्पादनबाबतचे प्रमाणपत्र संबंधित आसवनीचे प्रभारी अधिकारी / अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क यांच्याद्वारे निर्गमित केले जातील.

q) राज्यात साखरेची कमतरता भासल्यास साखर आयुक्त आदेश करतील अशा साखर कारखान्यांना साखरेचे उत्पादन घेणे बंधनकारक राहील.

r) बी-हेवी मळीपासून उत्पादीत होणाऱ्या इथेनॅालचे उत्पादन, साठवणूक यांच्यासंबंधीचे सर्व प्रकारची विवरणपत्रे आवसनीमध्ये उत्पादीत होणाऱ्या अन्य पदार्थांच्या नोंदीपासून स्वतंत्र ठेवण्यात याव्यात.

s) साखर कारखान्यांशी संलग्न असणाऱ्या आसवन्यांना बी हेवी मळीची वाहतूक ही पाईपलाईनद्वारे करण्यात येईल. याकरिता साखर कारखान्यात व संलग्न आसवनीच्या ठिकाणी एकाच प्रकारची वे-मेंट सिस्टम (वजनमापे यंत्रणा) स्थापित करण्यात येईल. साखर कारखान्यांकडून आसवनीकडे मळी वाहतूक करीत असताना त्याबाबतच्या विहित परिवहन पासवर आसवनीचे प्रभारी अधिकारी स्वाक्षरी करतील.

t) पाईप लाईनद्वारे वाहतूक केली जाणारी बी-हेवी मळी कोणत्याही प्रकारे दुषित होणार नाही याची संपूर्ण जबाबदारी साखर कारखान्याची व आसवनी व्यवस्थापनाची राहील.

u) राज्यात बी-हेवी मळीपासून इथेनॉलचे उत्पादन घेऊ इच्छिणाऱ्या स्टँड अलोन आसवनींना मळी वगळता अन्य उप-पदार्थापासून इथेनॉलचे उत्पादन घेता येणार नाही या अटीवरच परवानगी देण्यात येईल.

v) देशी / विदेशी मद्य उत्पादनासाठी लागणाऱ्या मद्यार्कांच्या उत्पादनाकरिता सामान्यत: सी-हेवी मळीचा वापर केला जातो. भविष्यात सी-हेवी मळीची उपलब्धता कमी झाल्यास त्याची पूर्तता बी-हेवी मळीपासून करण्यात येईल.

w) जर साखर कारखाना संलग्न आसवनी केवळ बी-हेवी पासून इथेनॉलचे उत्पादन घेऊ इच्छित असेल तर असे आसवनीधारक आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांना बंधपत्र सादर करुन त्यामध्ये आसवनीच्या आस्थापनेवर सर्व टँक व रिसीव्हर यांचा वापर बी-हेवी मळीच्या साठवणूकीसाठी व त्यापासून उत्पादन होणाऱ्या इथेनॉलच्या साठवणूकीसाठी करु शकतील.

x) साखर कारखान्यांपासून बी-हेवी व सी-हेवी मळीची वाहतूक ही स्वतंत्र पंपाव्दारे करण्यात येईल. प्रत्येक पंपासाठी एक वॉल्व लावण्यात येईल. बी-हेवी मळीच्या वाहतुकीच्या वेळी सी-हेवी मळीसाठी असलेल्या पंपाचा वॉल्व बंद राहील. अशाच प्रकारे सी-हेवी मळीच्या वाहतुकीच्या वेळी बी-हेवी मळीसाठी असलेल्या पंपाचा वॉल्व बंद राहील. अशाच प्रकारच्या वॉल्व आसवनीवर सुध्दा लावण्यात येतील. वरीलप्रमाणे स्थापित करण्यात आलेले वॉल्व कार्यान्वित नसल्यास क्षेत्रीय निरीक्षक व आसवनीचे प्रभारी अधिकारी सदरच्या वॉल्वस सीलबंद करतील. एका वेळेस केवळ एकाच प्रकारच्या मळीची वाहतूक करता येईल.

y) भविष्यात भारत सरकारव्दारा साखर कारखाने व आसवन्यांकरिता बी-हेवी व सी-हेवी मळीच्या वाहतुकीचे योग्य मोजमापाकरिता बीआयएस (BIS) मानांकित डेन्सिटी फ्लो मीटर लावण्यासंबंधी निदेश प्राप्त झाल्यास सदर निदेशांचे पालन करणे संबंधित कारखाने व आसवनी यांना बंधनकारक असेल.

z) आसवनीमध्ये तयार होणा-या इथेनॉलचा तेल व्यवस्थापन कंपन्यांना पुरवठा करण्यासाठी ऊसाचा रस/बी-हेवी/सी-हेवी मळीपासून इथेनॉल निर्मितीचे प्रमाणपत्र, विहित प्रपत्रात परिवहन पास इत्यादी आवश्यक प्रमाणपत्रे संबंधित आसवनीच्या प्रभारी अधिका-यांनी जारी करावेत.

aa) यानुषंगाने भविष्यात केंद्र शासन आणि राज्य शासनाकडून वेळोवेळी विहित करण्यात येणा-या अटी व शर्ती सर्व घटकांना बंधनकारक राहतील.

४. अनुज्ञप्तीधारकाने प्रभारी अधिकारी अथवा अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क यांना ऊसाचा रस/बी-हेवी/सी-हेवी मळीपासून इथेनॉल उत्पादन घेण्याबाबत लेखी कळविल्यानंतर संबंधित अधीक्षक कार्यालयाने ही बाब आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांना तात्काळ कळवावी. तद्नंतर, आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी त्यानुसार प्रस्ताव शासनास सादर करुन त्या प्रस्तावास १५ दिवसाच्या आत शासनाची पुर्वमान्यता घ्यावी व त्याप्रमाणे संबंधित घटकास कळवावे. त्यानंतरच घटकाने ऊसाचा रस, बी-हेवी अथवा सी-हेवी मळीपासून जलरहित मद्यार्काचे उत्पादन सुरु करावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०११६१७२४३११२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकीत करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Punam Hiraman Wagde

Digitally signed by Punam Hiraman Wagde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=26d7295f0f289d96eecb9e12c2850ebd4f894edc0ea69760a3c1561515a6bf87, cn=Punam Hiraman Wagde
Date: 2019.01.23 16:59:48 +05'30'

**(पु. हि. वागदे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन, मुंबई.
३. मा.मंत्री/राज्यमंत्री, राज्य उत्पादन शुल्क, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई - ३२.
५. प्रधान सचिव (राउशु), गृह विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई - ३२.
६. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई -२३.
७. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सर्व विभागीय उपआयुक्त, राज्य उत्पादन शुल्क.
९. सर्व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क.
१०. का. राउशु-३ (संग्रहार्थ).